<u>तात्काळ / अर्थसंकल्प प्राथम्य</u>　　　　　　　　　　　　　　<u>सन २०२१-२०२२ मधील निधी वितरण.</u>

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २८ जानेवारी, २०२२.

<u>पहा</u> :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३,दि. ६ एप्रिल, २०२१.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३,दि. २४ जून, २०२१.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पूरक-२०२१/प्र.क.७८/अर्थ-३,दि. २० जुलै, २०२१.
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३,दि. २९ जुलै, २०२१.
५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३,दि. १४ ऑक्टोबर, २०२१.
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पूरक-२०२१/प्र.क्र.१०६/अर्थ-३, दि. ३ जानेवारी, २०२२.

## <u>परिपत्रक</u>

कोविड-१९ च्या संसर्गजन्य रोगाच्या प्रादूर्भावामुळे सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात राज्याची कर व करेतर उत्पन्नातील अपेक्षित महसूली घट व त्याचे राज्याच्या वित्तीयव्यवस्थेवर होणारे परिणाम विचारात घेता वित्तीय उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने शासन निर्णय, वित्त विभाग, दि. १४ ऑक्टोबर, २०२१ नुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या प्रथम नऊमाही करीता अनिवार्य खर्चासाठी २१- पुरवठा व सामग्री, २६-जाहिरात व प्रसिध्दी,३१-सहायक अनुदाने(वेतनेतर), ३२-अशंदाने व ३३-अर्थसहाय्य या बाबींसाठी वगळून एकूण वार्षिक तरतूदीच्या ७५% व कार्यक्रम खर्चासाठी ६०% तसेच आमदार स्थानिक विकास कार्यक्रम व जिल्हा वार्षिक योजना यासाठी १०० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्यास सहमती देण्यात आली आहे. तसेच ०१-वेतन, ०४-निवृत्तीवेतन व ३६-सहायक अनुदाने (वेतन) अंतर्गत गरजेनुसार निधी वितरणाची कार्यवाही वित्त विभागाच्या स्तरावर केली जात आहे.

२. राज्याच्या अर्थव्यवस्थेस गती देण्यासाठी आता प्रशासकीय विभागांस भांडवली लेख्यातील कार्यक्रम व अनिवार्य खर्चाच्या बाबींसाठी १०० टक्के निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

३. सर्वसंबंधीत प्रशासकीय विभागांनी भांडवली खर्चासंदर्भातील निधीचे दिनांक ३१ मार्च,२०२२ पर्यंत खर्चाचे नियोजन करुन निधी वितरणाचे प्रस्ताव दिनांक १५ फेब्रुवारी, २०२२ पूर्वी वित्त व गरजेनुसार नियोजन विभागास सादर करावेत. दिनांक १५ फेब्रुवारी, २०२२ नंतर प्राप्त होणारे निधी वितरीणाचे प्रस्ताव वित्त विभाग स्विकारणार नाही, याची नोंद सर्व विभागांनी घ्यावी.

४. प्रशासकीय विभागांना उपरोक्त प्रमाणे उपलब्ध करुन दिलेला निधी त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय कार्यालयांना वा प्रशासकीय विभागांना वितरीत करताना हा निधी निश्चितपणे खर्च होईल याची खात्री करावी. **<u>सदर निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता त्यांच्या अधिनस्त क्षेत्रिय अधिकारी / मंडळे / महामंडळे यांच्या बॅक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.</u>**

५. वरील प्रमाणे प्रशासकीय विभागाने निधीचे वितरण करतांना तसेच तो खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकारी नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. या व्यतिरिक्त, या आर्थिक वर्षाच्या अखेरीस खरेदी करावयाच्या प्रस्तावासंदर्भातील कार्यवाहीबाबत वित्त विभागाकडून वेळोवेळी देण्यात आलेल्या व येणाऱ्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०१२८११२५२७८३०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant Krishna Patil

Digitally signed by Vasant Krishna Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=56462e610dbf070fe5eefa98886b167556f80b373181ed680e4c9c879d7e3617, serialNumber=14caf70544d4d2fb25d1da6ed673b0488e940d807179c09470fcdd9192ba4ce7, cn=Vasant Krishna Patil
Date: 2022.01.28 11:26:20 +05'30'

**( व. कृ. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव.
२) मा मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) मा. विरोधी पक्षनेता, (विधानपरिषद / विधानसभा), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४) सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७) सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली-११०००१.
९) प्रधान महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
१०) प्रधान महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती, अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.